महाराष्ट्र राज्य लॉटरी
दि. २ सप्टेंबर २०११ पासून काढण्यात येणा-या **"सागरलक्ष्मी / पद्मिनी / अक्षय व वैभवलक्ष्मी "**या सोडतीची बक्षिस रचना व कार्यपध्दती.

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन निर्णय क्र.सोडत २०११/ प्रक्र.१४० /लॉटरी २
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला , मंत्रालयासमोर,
मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३ ~~जुलै~~ २०११
ऑगस्ट

## शासन निर्णय

महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या निरनिराळया पारंपारिक साप्ताहिक सोडती रविवार खेरीज इतर दिवशी काढण्यात येतात. या साप्ताहिक सोडतीमध्ये सोमवार ते शुक्रवार (गुरूवार व शनिवार वगळून) अनुक्रमे **'सागरलक्ष्मी, पद्मिनी, अक्षय व वैभवलक्ष्मी '** या नावाने काढण्यात येणा-या साप्ताहिक सोडतींच्या बक्षिसरचनेत शासनाने दि. २ सप्टेंबर २०११ पासून बदल करण्याचा निर्णय घेतला आहे,

**"सागरलक्ष्मी /पद्मिनी /अक्षय व वैभवलक्ष्मी "** या साप्ताहिक सोडती केंद्र शासनाचा लॉटरी नियम-२०१० प्रमाणे कार्यान्वित करण्यात आल्या आहेत. त्यामधील प्रमुख मुद्दे खालील प्रमाणे आहेत.

शासनाने महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या साप्ताहिक **"सागरलक्ष्मी /पद्मिनी /अक्षय व वैभवलक्ष्मी "**या सोडतींसाठी प्रत्येक मालिकेत ८०००० तिकीटे असलेल्या पाच मालिकांत मिळून ४ लाख तिकीटे मुद्रीत करण्याचा निर्णय घेतला आहे. या सोडतीतील प्रत्येक मालिकेमध्ये तिकीटांचे क्रमांक १०,००० ते ८९,९९९ या प्रमाणे देण्यात आलेले आहेत. या सोडतीमध्ये पहिले बक्षिस रू. ५ लाख (सामायिक) बक्षिस ठेवण्यात आले आहे. तसेच इतरही बक्षिसे ठेवण्यात आलेली आहेत.

साप्ताहिक **"सागरलक्ष्मी /पद्मिनी /अक्षय व वैभवलक्ष्मी "**सोडतीची तिकीटे उपसंचालक (वि.व ले.) महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू.),मुबई-१५ यांचे कार्यालयातून सर्व विक्रेत्यांना उपलब्ध होतील. या बक्षिसरचनेतील रु.१०,०००/- व त्याखालील असणाऱ्या सर्व बक्षिसांचे प्रदान बक्षिस विजेत्यांना केल्याबद्दल त्याच्या प्रतिपूर्तीनंतर विक्रेत्यांना २ % सेवाआकार देण्यात येईल.

२. या सोडतीची तिकीट विक्री उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी यांच्या कार्यालयातून करताना महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या तिकीट विक्रेत्यांना या तिकीट विक्रीच्या १०० तिकीटांचे एका पुस्तकावर (M.R.P. Rs. 10/- each ticket) तिकीटांच्या दर्शनी किंमतीवर एकाच वेळी घेण्याकरिता पुढीलप्रमाणे घाऊक सूट (Discount) देण्यात येईल.

| अ.क्र. | तिकीटांची संख्या | घाऊक सूट | **शेरा** |
|---|---|---|---|
| १ | ५०० ते ४०००० तिकीटे | २० % | घाऊक अभिकर्त्याने साखळीतील शेवटच्या किरकोळ विक्रेत्यास कमीत कमी १८% सूट द्यावयाची आहे. |
| २ | ४०००१ ते १००००० तिकीटे | २४ % | |
| ३. | १००००१ पेक्षा अधिक | २६ % | |

अभिकर्त्याने या सोडतीची लॉटरीची तिकीटे खरेदी केल्यानंतर त्याच अभिकर्त्याने पुन्हा तिकीटे खरेदी केल्यास त्यास या सोडतीच्या यापूर्वी खरेदी केलेल्या तिकीटावर जी घाऊक सूट (Discount) देण्यात आली असेल तेवढी कमीत कमी सूट पुढील तिकीट खरेदीवर देण्यात येईल.

या सोडतीत एकूण ५ मालिका असून प्रत्येक मालिकेत ८०००० तिकीटे असून एकूण ४ लाख तिकीटे मुद्रीत करण्यात येणार आहेत. प्रत्येक मालिकेतील तिकीटांचे क्रमांक १०००० ते ८९९९९ या प्रमाणे देण्यात आलेले आहेत.

घाऊक अभिकत्याने ज्या किरकोळ अभिकर्त्यांस तिकीटे विकली असतील त्या किरकोळ अभिकर्त्यांची यादी (तिकीटांच्या क्रमांकासह) घाऊक अभिकर्त्यांने पुढील तिकीट खरेदीच्यावेळी महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या शिवडी कार्यालयात सादर करावयाची आहे.

३. दि. २ सप्टेंबर २०११ पासून काढण्यात यावयाच्या या साप्ताहिक सोडतींची बक्षिसरचना पुढीलप्रमाणे असेल.

## सागर लक्ष्मी /पद्मिनी /अक्षय व वैभव लक्ष्मी सोडतींची बक्षिसांची योजना

५ मालिका
तिकीटांचे क्रमांक १०,००० ते ८९,९९९ प्रत्येक मालिकेत
सोडत दिनांक ०२/०९/२०११ पासून
वेळ सांय ५.०० वा.

प्रत्येक मालिकेत ८० हजार तिकिटे
एकूण तिकिटे ४ लाख
तिकीटांची किंमत रू.१०/-

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम रूपये | प्रत्येक मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकेतील बक्षिसांची एकूण रक्कम रूपये | विक्रेता बोनस (प्रत्येक मालिकेत) | एकू विक्रेता बोनस रूपये |
|---|---|---|---|---|---|---|
| पहिले (सामायिक) बक्षिस (पूर्ण क्रमांक) | ५,००,००० | -- | १ | ५,००,००० | ५००० | ५००० |
| दुसरे बक्षिस (पहिल्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरीत मालिकांसाठी) | १०,००० | | ४ | ४०,००० | | |
| तिसरे बक्षिस (शेवटचे ४अंक) प्रत्येक मालिकेत | ५,००० | ८ | ४० | २,००,००० | | |
| चौथे बक्षिस (शेवटचे ४अंक) प्रत्येक मालिकेत | १००० | ८ | ४० | ४०,००० | | |
| पाचवे बक्षिस (शेवटचे ४अंक) (पाच जुळवण्या) | ५०० | ४० | २०० | १,००,००० | | |
| सहावे बक्षिस (शेवटचे ४अंक) (दहा जुळवण्या) | १०० | ८० | ४०० | ४०,००० | | |
| सातवे बक्षिस (सर्व मालिकांसाठी) (कोणत्याही ४ अंकावर काढण्यात येणाऱ्या क्रमांकास व त्या पुढील तसेच मागील प्रत्येक दहाव्या क्रमांकास रू. ३०/- चे बक्षिस देण्यात येईल ) | ३० | | ४०००० | १२,००,००० | | |
| **एकूण** | | | ४०६८५ | २१,२०,००० | | ५००० |

वरील बक्षिसरचनेत विक्रेता बोनसचाही समावेश करण्यात आला आहे. अभिकर्त्यांच्या साखळीतील शेवटच्या विक्रेत्यास पहिल्या क्रमांकाच्या बक्षिसपात्र तिकीटासाठी रू. ५०००/- इतकी रक्कम विक्रेता बोनस म्हणून देण्यात येईल.

**४. सोडतीची कार्यपध्दती :-**

साप्ताहिक "**सागरलक्ष्मी /पद्मिनी /अक्षय व वैभवलक्ष्मी** "या सोडतींकरीता सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा ठिकाणी ६ ड्रम ठेवले जातील प्रत्येक मालिकेमध्ये १०,००० ते ८९,९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. पहिल्या ड्रममध्ये मालिकांचे क्रमांक असतील दुसऱ्या ड्रममध्ये १ ते ८ अंकांच्या प्रत्येकी एक चकती याप्रमाणे आठ चकत्या टाकण्यात येतील व उर्वरित ४ ड्रममध्ये ० ते ९ अंकाच्या प्रत्येकी एक चकती याप्रमाणे दहा चकत्या टाकण्यात येतील. पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात(पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी पुन्हा घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रममधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील.

४.१ त्यानंतर तिसरे, चौथे, पाचवे, सहावे व सातवे क्रमांकाचे बक्षिस निश्चित करण्याची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे राहील.

**४.२ तिसरे बक्षिस रू. ५०००/-** तिसऱ्या रु ५,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक वेगवेगळी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्रपणे जुळवणी काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. ५०००/- च्या तिसऱ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**४.३ चौथे बक्षिस रू. १०००/-** चौथ्या रु. १,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक वेगवेगळी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्रपणे जुळवणी काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. १०००/- च्या चौथ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**४.४ पाचवे बक्षिस रू. ५००/-** पाचव्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रममधून ४ अंकाच्या अशा पाच जुळवण्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. ५००/- च्या पाचव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**४.५ सहावे बक्षिस रू. १००/-** सहाव्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रममधून ४ अंकाच्या अशा दहा जुळवण्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. १००/- च्या सहाव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**४.६ सातवे बक्षिस रू. ३०/- चे काढण्याची कार्य पध्दती :-**

सातव्या बक्षिसासाठी कोणताही ४ अंकाचा एक क्रमांक काढण्यात येईल त्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील येणाऱ्या प्रत्येकी १०व्या क्रमांकास रू. ३०/- चे सातवे बक्षिस सर्व मालिकांसाठी देण्यात येईल.

**वरील सर्व मालिकांचे बक्षिस विजेते क्रमांक काढल्यानंतर पहिले बक्षिस काढण्यात येईल.**

**५. पहिल्या क्रमाकांचे रू. ५,००,०००/- चे बक्षिस काढण्याची कार्यपध्दती :-**

या साप्ताहिक सोडतीमध्ये **पाच मालिकात मिळून रूपये पाच लाखाचे एक (सामायिक) पहिले बक्षीस** ठेवण्यात आलेले असून त्यासाठी प्रथमतः पाच मालिकांमधून एक भाग्यवान मालिका निश्चित करण्यात येईल. त्यासाठी प्रत्येक मालिकेची अद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक चकती स्वतंत्र प्लॅस्टिक/रबरी आवरणात घालून पंचमंडळाच्या समोर स्वतंत्र ड्रममध्ये ठेवली जाईल. अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम फिरविला जाऊन व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येईल. ड्रममधून एकच पिशवी(पाऊच) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर काढण्यात येईल व ती पंचमंडळाला दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील. त्यानंतर वरील परिच्छेद ४ मध्ये विहित केलेल्या पध्दतीने भाग्यवान क्रमांक काढण्यात येईल.

**५.१ रू. १०,०००/- चे दुसरे बक्षिस काढण्याची कार्य पध्दती :-**

या दुसऱ्या बक्षिसासाठी पहिल्या क्रमांकाच्या बक्षिसाची मालिका वगळून चार वेगवेगळे पूर्ण भाग्यवान क्रमांक उर्वरित मालिकांकरिता स्वतंत्ररित्या काढण्यात येतील व त्या क्रमांकास रू. १०,०००/- चे दुसरे बक्षिस देण्यात येईल.

६. पंचमंडळाचे सदस्य त्यांना पुरविलेल्या बक्षिस विजेत्या क्रमांकाच्या नोंदवहीत विजेत्या क्रमांकांची नोंद करुन घेतील व त्या प्रतीवर सही करतील आणि ती प्रत निकालाच्या अभिलेखाची विश्वसनीय प्रत म्हणून ठेवली जाईल.

६.१ या सोडतीमध्ये कोणत्याही बक्षिसामध्ये एकापेक्षा जास्त भाग्यवान क्रमांक निश्चित करताना एखादा क्रमांक पुन्हा आल्यास तो रद्द करुन त्या ऐवजी पुन्हा नवीन भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येईल.

६.२ या सोडतीतील बक्षिस विजेत्याने कोणत्याही बक्षिसाची मागणी करताना त्यास मूळ तिकीट शासनाकडे सादर करणे बंधनकारक राहील, तसेच कोणत्याही तिकीटांवर एकाच बक्षिसाची मागणी करता येईल.

६.३ महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या कोणत्याही सोडतीमधील एखाद्या बक्षिसाकरिता एकापेक्षा जास्त पूर्ण भाग्यवान क्रमांक किंवा जुळवण्या काढण्यात येत असतील अशावेळी कोणत्याही क्रमांकाची त्याच मालिकेत पुनरावृत्ती झाल्यास किंवा दोन्ही क्रमांक /एकापेक्षा जास्त क्रमांक सारखे आल्यास ते नंतर काढलेले क्रमांक रद्द करून त्याऐवजी नवीन क्रमांक काढण्यात येतील.

६.४ वर नमूद केल्याप्रमाणे या सोडतीमधील बक्षिस विजेत्या तिकीटाचे क्रमांक निश्चित करण्यासाठी ड्रम किंवा विजेवर चालणारी व चक्रावर क्रमांक लावलेली (ड्रॉ मशीन) सोडत यंत्र, वा त्याचप्रमाणे सोडत जलद काढण्याच्या शासनाच्या दृष्टीने योग्य पद्धतीचा अवलंब सोडत काढताना करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(अ. मा. आत्राम)
उपसंचालक, राज्य लॉटरी तथा
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रति,

१. मा. उप मुख्यमंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा. राज्यमंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई ३२.
३. प्रधान सचिव / सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
४. प्रधान सचिव /सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
५. अतिरिक्त पोलीस महासंचालक (कायदा व सुव्यवस्था)
६. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महासंचालक, शासकीय मुद्रण, लेखन सामग्री व प्रकाशने
८. संचालक, अल्पबचत व राज्य लॉटरी.
९. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. उपसंचालक(वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पूर्व) मुंबई १५.
१४. कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन, वित्त विभाग (प्रशासन -४) मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती, लॉटरी - २.